**अपंग व्यक्ती, ( समान संधी , संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण ) अधिनियम १९९५ नुसार उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत येणा-या गट "अ" व गट"ब"मधील नामनिर्देशनाने नियुक्ती करावयाच्या सर्व पदांवर शारिरीकदृष्टया अपंगांसाठी आरक्षण.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १००२/(६९८/२००२)/आस्था-१,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,

दिनांक ११ सप्टेंबर, २००३.

**वाचा :** (१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग ,क्रमांकः ओडिओ-१२९७/(३८२/९७)/आस्था-१, दिनांक २६.११.१९९८.

(२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग ,क्रमांकः ओडिओ-१२९७/(३८२/९७)/आस्था-१, दिनांक २९.९.१९९९.

(३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग ,क्रमांकः ओडिओ-१२९७/(३८२/९७)/आस्था-१, दिनांक १२.११.१९९९.

(४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग ,क्रमांकः ओडिओ-१२९७/(३८२/९७)/आस्था-१, दिनांक २.२.२००१

**शासन निर्णय :** उपरोक्त शासन निर्णयान्वये या विभागाच्या अखत्यारितील संचालनालयांच्या अधिपत्याखालील गट **अ** व गट **ब** च्या पदांवर अपंगत्वाचे प्रमाण ४०% ठेवून अपंग व्यक्तींना सरळसेवा भरतीत ३% आरक्षण ठेवण्यात आले होते. तथापि कांही पदांना अपंग आरक्षणातून वगळण्यात आले होते. तथापि तंत्रज्ञानात झालेल्या विकासाचा विचार करुन व सर्व पदांचा आढावा घेऊन सूट रद्द करणे व अपंग आरक्षण विहित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

२. अपंग व्यक्ती( समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण ) अधिनियम १९९५(१९९६ चा क्र. १ ) हा अधिनियम, ७ फेब्रुवारी, १९९६ पासून लागू झाला आहे. या अधिनियमांतील कलम ३२ व ३३ मधील तरतुदींन्वये या विभागाच्या अखत्यारितील -

१. उच्च शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

कृ.मा.पहावे

६.सर्व अकृषी विद्यापीठे.

यांच्या कार्यालयातील तसेच त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय व अनुदानित शिक्षण संस्थांमधील सर्व गट **अ** व गट **ब** च्या पदांवर अपंग व्यक्तींना सरळसेवा भरतीत ठेवावयाच्या आरक्षणाबाबत शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे .

(अ) अपंग व्यक्ती ( समान संधी , संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण ) अधिनियम १९९५ (१९९६ चा क्र. १ ) या अधिनियमातील कलम ३२ व ३३ लक्षात घेता या विभागाच्या अखत्यारितील सर्व संचालनालयातील व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शासकीय / अनुदानित संस्थांमधील खालील (क) येथील पदे वगळता गट **अ** व गट **ब** च्या सर्व पदांवर सरळसेवा भरतीमध्ये अंध /अल्पदृष्टी, कर्णबधिर आणि अस्थिव्यंग या अपंग प्रवर्गाकरिता प्रत्येकी १% याप्रमाणे एकूण ३% आरक्षण ठेवण्यात यावे व हे आरक्षण आळीपाळीने कार्यरत करावे.

(ब) गट **अ** व गट **ब** मधील सर्व पदे सरळसेवा भरतीने भरताना अपंग उमेदवारांसाठी अपंग व्यक्ती ( समान संधी , संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण ) अधिनियम १९९५ ( १९९६ चा क्र. १ ) या अधिनियमांतील कलम ३२ व ३३ नुसार शारिरीक पात्रतेचे निकष खालीलप्रमाणे असावेत.

१. अल्पदृष्टी-कलम २ (यू) प्रमाणे

कलम(U) :- Person with low vision:- means a person with impairment of visual functioning even after treatment or standard refractive correction, but who uses or is potentially capable of using vision for the planning or execution of a task with appropriate assistive device.

२. कर्णबधीर :- कलम २ (एल) प्रमाणे

कलम(L):- Hearing implairment:- means loss of sixty decibles or more in the better ear in the conversational range of frequencies.

३. अस्थिव्यंग :- कलम २ (ओ) प्रमाणे

कलम (O):- Locomotor disability:- means disability of the bones, joints, muscles leading to substantial restriction of the movement of the limbs or any form of cerebral palsy.

४. अपंग व्यक्ती :- कलम २ (टी ) प्रमाणे

कलम(T):- person with disability:- means a person suffering from not less than forty percent of any disability as certified by a medical authority

(क) उच्च शिक्षण संचालनालय , विद्यापीठांतर्गत व अनुदानित संस्थांतील शारिरीक शिक्षण संचालक, शारिरीक शिक्षण उपसंचालक , शारिरीक शिक्षण सहाय्यक संचालक व शारिरीक शिक्षण निर्देशक ही पदे सरळ सेवेने भरताना अस्थिव्यंग / मंदमती या अपंग प्रवर्गाकरिता आरक्षण असणार नाही. तथापि ४० ते ६० टक्के

अंध व्यक्ती व श्रवणयंत्राचे सहाय्याने ऐकू येणारी कर्णबधिर व्यक्ती यांना प्रत्येकी १% आरक्षण लागू करण्यात यावे.

(ड) या निकषांनुसार अपंग व्यक्तींची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी. निवड समिती / महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून उमेदवारांची शिफारस प्राप्त झाल्यावर अशा उमेदवारांस त्यांच्या शारिरीक पात्रतेसंदर्भात संबंधित विषयाच्या तज्ञांचा समावेश असलेल्या वैद्यकीय मंडळाने प्रमाणित केल्यानंतरच अशा अपंग व्यक्तींची शासन सेवेत सरळसेवा पदांवर नियुक्ती करण्यात येईल. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही १०९७/प्र.क्र.३१/९८/१६अ, दिनांक १६ मार्च, १९९९ मध्ये स्पष्ट केल्यानुसार अपंगांसाठी असलेले आरक्षण हे समांतर आरक्षण असून हे समांतर आरक्षण सामाजिक आरक्षणांतर्गत आरक्षण राहिल. अशा अपंग व्यक्तींची सरळसेवा भरतीने नियुक्ती करताना खालील निकष विचारात घ्यावेत.

**अ) संबंधित सेवाप्रवेश नियमाच्या तरतुदीनुसार अपंग उमेदवार अर्हताधारक असेल तर**

**ब) या संवर्गातील पदांची कर्तव्ये व जबाबदा-या लक्षात घेवून त्याप्रमाणे वैद्यकीय मंडळाने समक्ष ठरविल्यास**

**क) वर दर्शविल्यानुसार प्रत्येकी एक टक्क्याप्रमाणे एकूण ३% पर्यंत सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवून नियुक्ती करण्यात यावी.**

(इ) यापूर्वी अपंग आरक्षणाबाबतचे विभागाने निर्गमित केलेले संदर्भाधिन दिनांक २६/११/१९९८, २९/९/१९९९, १२/११/१९९९ व २/२/२००१ चे शासन निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित झाले असून ते रद्द झाले असे समजावे.

हे आदेश सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य क्रिडा व वि.स. विभाग, पत्र क्रमांक अपंग -२००२/प्र.क्र. ३२६सुधार-३, दिनांक ११ सप्टेंबर, २००३ अन्वये तसेच अपंग आरक्षणासाठी असलेल्या तज्ञ समितीच्या दि. ४/९/२००३ च्या बैठकीत केलेल्या शिफारशींनुसार त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( बा. वि. निकम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
१. मा. राज्यपाल यांचे सचिव.

२.मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३.मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मंत्री (उच्च शिक्षण) यांचे खाजगी सचिव
५.मा. मंत्री (उर्जा व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव
६.मा. राज्यमंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव
७. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
८.सचिव , महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( पत्राने )
९.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२ मुंबई / नागपूर.
१०.महालेखापाल ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई / नागपूर.
११.अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई.
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी , मुंबई.
१३.संचालक, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, महाराष्ट्र राज्य , कोकण भवन , नवी मुंबई
१४. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय , महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१८. संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९. सर्व विद्यापीठांचे कुलसचिव.
२०.उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व उपसचिव , सर्व अवर सचिव , सर्व कार्यासन अधिकारी .
२१.अ.मु.सचिव , सामाजिक न्याय सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग , मंत्रालय मुंबई ३२.
२२.प्र. सचिव , सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.
२३.सचिव , आदिवासी विकास विभाग , मंत्रालय , मुंबई ३२.
२४.प्र. सचिव , वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.
२५.सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव , प्रधान सचिव , सचिव .
२६. निवड नस्ती , आस्था १.